तहसिलदार संवर्गात पदोन्नतीने
पदस्थापना देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. पदोन्न-२०२३/प्र.क्र.११४/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०७ मार्च, २०२४

**संदर्भ:-** १) महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. पदोन्न-२०२३/प्र.क्र.११४/ई-३, दि.०१.०८.२०२३
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१

**शासन आदेश:-**

संदर्भाधीन क्र. १ येथील शासन आदेशान्वये श्री. डी. बी. निलावाड, नायब तहसिलदार, गट-ब (वेतनश्रेणी एस-१४ रू. ३८६००-१२२८००) यांना तहसिलदार, गट-अ (वेतनश्रेणी एस-१९- रू. ५५१००-१७५१००) या संवर्गात सदर आदेशातील नमुद अटी व शर्तीच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०२१ विचारात घेऊन निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात आलेल्या श्री. डी. बी. निलावाड, तहसिलदार यांना खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महसूली विभाग वाटपानुसार पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | वाटप केलेला महसूल विभाग | पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री. डी. बी. निलावाड | छत्रपती संभाजीनगर | तहसिलदार पाटोदा जि. बीड या रिक्त पदावर |

३. सदर पदोन्नतीचे आदेश तात्काळ अंमलात येत असून श्री. डी. बी. निलावाड यांनी पदोन्नतीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे.

४. उपरोक्त अधिका-यांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटपाबाबतच्या अधिसूचना विचारात घेऊन महसूली विभाग वाटप करण्यात येत आहे.

५. सदर पदोन्नतीचे आदेश प्राप्त झाल्यापासून संबंधित अधिका-यांना शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये.

६. या आदेशान्वये पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू न झाल्यास संबंधित अधिका-यांना पदोन्नतीचे लाभ अनुज्ञेय होणार नाहीत.

७. नायब तहसिलदार संवर्गातून तहसिलदार या संवर्गात पदोन्नत झालेल्या उपरोक्त अधिका-यांनी पदस्थापनेच्या पदावर रुजू होऊन कार्यभार स्वीकारल्यानंतरच तहसिलदार एस-१९-(रू. ५५१००-१७५१००) या संवर्गाच्या वेतनाचे लाभ अनुज्ञेय राहतील.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०७१७४१५५७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=d36a0a6455652c60ea76104dd537113a9ca67ab14a315b9cefc36fc9be2915f8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2024.03.07 17:51:19 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांचेमार्फत).
- उप सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).